न्यायालये व कारागृहे यामध्ये व्हीडीओ संपर्क स्थापन करण्यासाठी येणा-या खर्चाबाबत व त्यासाठी कराव्या लागणा-या न्यायिक प्रक्रियेचा विचार व अभ्यास करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-०१२०/१२(४५)/पीआरएस-२.

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक:- 13 नोव्हेंबर, २०००.

पहा:- १) श्रीमती मी.मा.रेगे,उप सचिव,विधी व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२ यांचे अर्धशासकीय पत्र क्रमांक-एमओएम- १०२ के(२९)-नक, दिनांक २१.३.२०००.

**शासन निर्णय:-**

मा.मुख्यमंत्री व मा.मुख्य न्यायमूर्ती, उच्च न्यायालय,मुंबई यांच्यामध्ये दिनांक ७.२.२००० रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तातील मुद्दा क्रमांक-३ च्या अनुषंगाने न्यायालये व कारागृहे यामध्ये व्हीडीओ संपर्क स्थापन करण्यासाठी येणा-या खर्चाबाबत व त्यासाठी कराव्या लागणा-या न्यायिक प्रक्रियेचा विचार व अभ्यास करण्यासाठी एक समिती गठीत करण्याचा शासनाचा विचार चालू होता.

उपरोक्त परिच्छेदात नमूद करण्यात आलेल्या बाबींच्या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

न्यायालये व कारागृहे यामध्ये व्हीडीओ संपर्क स्थापन करण्यासाठी किती खर्च येणार आहे, तसेच असा संपर्क स्थापन करण्यासाठी न्यायिक प्रक्रियेमध्ये काय फरक करावा लागणार आहे याचा विचार व अभ्यास करण्यासाठी १ समिती गठीत करण्यात येत असून या समितीमध्ये पुढील अधिका-यांचा समावेश करण्यात येत आहे.

(१) मा.प्रधान सचिव,विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

(२) मा.कारागृह महानिरीक्षक,
कारागृह महानिरीक्षणालय,म.रा.पुणे.

(३) मा.प्रबंधक,मा.उच्च न्यायालय,
मुंबई.

उपरोक्त मा.सदस्यांपैकी मा.कारागृह महानिरीक्षक,कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांची उपरोक्त अभ्यास गटाचे/समितीचे सचिव म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

उपरोक्त अभ्यास गटाने विषयांकित बाबींबाबत सविस्तर चर्चा करुन शासनास आदेशाच्या दिनांकापासून ३ महिन्यांच्या आत प्रस्ताव सादर करावा.

हे आदेश विधी व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-३१५ का.१ दिनांक ३.१०.२००० अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( सु.म.माने )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.प्रधान सचिव,विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

मा.कारागृह महानिरीक्षक,कारागृह महानिरीक्षणालय,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

मा.प्रबंधक,मा.उच्च न्यायालय,मुंबई-४०० ०३२ (पत्राद्वारे)

मा.प्रधान सचिव (तुरुंग) गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

मा.उप सचिव,विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

मा.उप सचिव (तुरुंग) गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

निवडनस्ती.